**प्रादेशिक योजनांमधील गावांना स्वतंत्र पाणी पुरवठा योजना मंजून करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन परिपत्रक क्र.ग्रापाधो-१११९/प्र.क्र. १००/पापु-०७**
**मंत्रालय,मुंबई - ४०० ०३२ ,दि. २७ जून,२०११**
**वाचा-शा.नि.पा.पु.व स्व.वि.,क्र.ग्रापाधो-११०९/प्र.क्र.१०४ (अ)/पापु- ०७,दि.१७ मार्च,२०१०**

**प्रस्तावना :** संदर्भाधिन शासन निर्णयातील परि.७.२ अनुसार ज्या गावांमध्ये प्रादेशिक किंवा स्वतंत्र पाणी पुरवठा योजना अस्तित्वात आहे,परंतू पाणीपट्टीच्या वसुली अभावी ती बंद आहे ,अशा गावांकरीता नवीन योजना मंजूर केली जात नाही.तसेच प्रादेशिक पाणी पुरवठा योजनेमध्ये समाविष्ट असलेल्या गावांमध्ये स्वतंत्र योजना मान्य केली जात नाही.मात्र आवश्यकतेप्रमाणे अशा योजनांमध्ये सुधारणा करण्याच्या प्रस्तावावर विचार केला जातो.

दि.१७ मार्च,२०१० च्या शासन निर्णयात वरिलप्रमाणे तरतूद असली तरी प्रादेशिक पाणी पुरवठा योजनांमध्ये समाविष्ट असलेल्या काही गावांना पाणी पुरवठ्याबाबत अडचणी येत असल्यामुळे शासनाकडे प्रादेशिक योजनांमधील गावांना स्वतंत्र योजना मंजूर करण्याची विनंती/मागणी करण्यात येते व ब-याचदा शासन स्तरावरुन प्रादेशिक योजनांमधील गावांना स्वंतंत्र पाणी पुरवठा योजना करण्याची परवानगी देण्यात येते.मात्र त्यासाठी शासनस्तरावरून कोणतेही निकष विहित करण्यात आले नाही. ही बाब विचारात घेता प्रादेशिक योजनांमधील गावांना स्वंतंत्र पाणी पुरवठा योजना मंजूर करावयाची असल्यास त्यासाठी काही निकष विहित करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासनपरिपत्रक-**

प्रस्तावनेत नमुद केलेली वस्तुस्थिती विचारात घेता केवळ खालील परिस्थितीतच प्रादेशिक पाणी पुरवठा योजनांमध्ये समाविष्ट असलेल्या गावांना स्वतंत्र पाणी पुरवठा योजना मंजूर करण्यात याव्यात-

१)संबंधित प्रादेशिक पाणी पुरवठा योजना पुर्णपणे मोडकळीस आली असल्यास

२)प्रादेशिक योजनेतील टोकाच्या / शेवटच्या गावांना पाणी पुरवठा होत नसल्यास

३)प्रादेशिक योजनेतील काही गावांमध्ये गावाजवळ नवीन उद्भव विकसीत झाला असेल व नवीन उद्भवातून मिळणारे पाणी प्रादेशिक योजनेतील पाण्यापेक्षा स्वस्त असेल

४)नवीन प्रस्तावित प्रादेशिक योजनांमधील गावांनी,प्रादेशिक पाणी पुरवठा योजनेच्या कामांना सुरुवात होण्यापुर्वीच स्वतंत्र पाणी पुरवठा योजनेची मागणी केली असल्यास

५)ज्या प्रादेशिक पाणी पुरवठा योजनांची कामे ब-याच कालावधीपासून अपुर्ण आहेत अथवा प्रादेशिक पाणी पुरवठा योजनेत त्रुटी निर्माण झाल्या आहेत,अशा योजनांमधील पाणी पुरवठा होत नसलेली गावे.

२. ज्या गावांमध्ये प्रादेशिक पा.पु.योजनेचे पाणी कमी पडत असेल,अशा गावांसाठी स्वंतत्र पाणी पुरवठा योजना मंजूर न करता फक्त वाढीव उद्भवाची कामे घेण्यात यावीत.तसेच प्रादेशिक योजनेतील मोठी गावे वगळल्यामुळे जर प्रादेशिक पाणी पुरवठा योजनेच्या शाश्वत्ततेवर (Sustainability)विपरित परिणाम होत असेल तर अशी गावे प्रादेशिक योजनेतून वगळण्यास परवानगी देण्यात ये़उ नये.

३. प्रादेशिक पाणी पुरवठा योजनेअंतर्गत पुर्ण करण्यात आलेल्या उपांगांचा नवीन स्वतंत्र पाणी पुरवठा योजनेत उपयोग करुन घेणे अनिवार्य राहील.

४. प्रादेशिक योजनांमधील गावांना स्वंतंत्र पाणी पुरवठा योजना मंजूर करावयाची असल्यास त्यासाठी उपरोक्त सुचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेब-साईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०११०६२७११४५४३००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**सही/-**
(र.अं.खडसे )
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,
मा.मंत्री(पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव,
मा.राज्य मंत्री(पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव,
सर्व विभागीय आयुक्त,
सदस्य सचिव,महाराष्ट्र जीवन प्राधिकरण,मुंबई
संचालक,भुजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा,पुणे,
मुख्य कार्यकारी अधिकारी,सर्व जिल्हा परिषदा
सर्व अधिक्षक अभियंता,विभागीय भारत निर्माण कक्ष
सर्व कार्यकारी अभियंता,महाराष्ट्र जीवन प्राधिकरण,
सर्व कार्यकारी अभियंता,ग्रामिण पाणी पुरवठा विभ ाग,जिल्हा परिषद
महालेखापाल,महाराष्ट्र - १ मुंबई(लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता)

महालेखापाल,महाराष्ट्र  - २ नागपूर (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता)
मुख्य लेखा परिक्षक,स्थानिक निधी लेखा,नवी मुंबई
उप मुख्य लेखा परिक्षक,स्थानिक निधी लेखा, नाशिक,पुणे,औरंगाबाद,अमरावती व नागपूर
सर्व प्रादेशिक उपसंचालक,भुजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा,
सर्व  प्रादेशिक मुख्य अभियंता,महाराष्ट्र जीवन प्राधिकरण
मुख्य अभियंता,भारत निर्माण कक्ष,नवी मुंबई
सर्व जिल्हा वरिष्ठ भूवैज्ञानिक, भुजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा
सर्व गट विकास अधिकारी,पंचायती समिती
नियोजन विभाग,मंत्रालय,मुंबई
वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,मंत्रालय,मुंबई
पाणी पुरवठा विभागातील सर्व पर्यवेक्षीय अधिकारी व कार्यासने
निवड नस्ती,पापु-०७